**राज्यक्षेत्रातील योजना**

**पिंपरी (मेघे) व १० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. जि. वर्धा या योजनेच्या अंदाजपत्रक व आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु-२९०७/प्र.क्र.१७८/ पापु-१३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांकः ३ जुलै, २००९**

**संदर्भः १) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापापु-३४०५/प्र.क्र.१०४/ पापु-१३, दि.२०/७/२००५**
**२)अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.मजीप्रामंना/तांशा-३/३४२१, दि.१०/१०/२००७**

**प्रस्तावना- पिंपरी (मेघे) व ९ गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. जि. वर्धा** या योजनेच्या रु. ३०८६.१६ लक्ष खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदरची योजना दरडोई/दरदिवशी ७० लिटर्सप्रमाणे आखण्यात आली असल्याने योजनेचा वित्तीय आकृतीबंध खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आला होता. त्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संचालक मंडळाने मान्यता दिली होती.

**योजनेचा वित्तीय आकृतीबंध**

| | |
|---|---|
| अ) योजनेची ढोबळ किंमत | : रु.३०८६.१६ लक्ष |
| ब) शासकीय अनुदान<br>(४० लिटर प्रमाणे किंमतीच्या ९० टक्के+ धाम प्रकल्पाची उंची वाढविण्याकरिता सिंचन विभागाकडे जमा करावयाची रक्कम)<br>(१६६०.८३+ ४२५.७० = रु.२०८६.५३ लक्ष) | : रु.२०८६.५३ लक्ष |
| क)मजीप्राने उभारावयाचे कर्ज<br>(१० टक्के लोकवर्गणी+ उर्वरित रक्कम)<br>(१८४.५४+८१५.०१ = ९९९.६३ लक्ष) | : रु.९९९.६३ लक्ष |

त्यानंतर या योजनेमध्ये वायगांव (निपाणी) या गावाचा समावेश मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,नागपूर यांनी केला. त्यामुळे योजनेच्या संकल्पनात, आराखडे व अंदाजपत्रकात बदल होवून योजनेच्या खर्चात वाढ झाली.त्यामुळे अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांनी पिंपरी (मेघे) व १० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. जि. वर्धा या प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या रु.४०८१.५० लक्ष किंमतीच्या सुधारित आराखड्यास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये पाठविला आहे, त्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-** वरील प्रस्तावनेच्या अनुषंगाने पिंपरी (मेघे) व १० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना ता. जि. वर्धा या योजनेच्या रु.४०८१.५० लक्ष (अक्षरी रुपये चार कोटी एक्याऐंशी लक्ष पन्नास हजार फक्त) ढोबळ किंमतीच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत असुन त्याचाआकृतीबंध खालीलप्रमाणे राहिल. या आकृतीबंधास मजीप्राच्या संचालक मंडळाने मान्यता दिली आहे.

| | |
|---|---|
| १) योजनेची ढोबळ किंमत | : रु.४०८१.५०लक्ष |
| (धरणाचे अंशदान वगळुन योजनेची किंमत | : रु.३४०६.५०लक्ष) |
| २) शासकीय अनुदान (९० टक्के) | : रु.३०६५.८५लक्ष |
| ३)धरणाच्या अंशदानापोटीची रक्कम (शासकीय अनुदान) | : रु.६७५.०० लक्ष |
| | ----------------------------- |
| एकूण शासकीय अनुदान | : रु.३७४०.८५ लक्ष |
| ४)१० टक्के लोकवर्गणीची रक्कम | : रु.३४०.६५ लक्ष |
| | ----------------------------- |
| एकुण किंमत | : रु.४०८१.५० लक्ष |

१. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यांत येईल.

२. या योजनेस मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत, त्या लागू राहतील.

३. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी पाणीपट्टी वाढविण्याची अट राहिल. पाणी पट्टी वाढवितांना १० टक्के लोकवर्गणीचा हिस्याची रक्कम वसूल करण्यात यावी. योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नवीन करण्यासाठी आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल अशी बघण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

४. या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. **"वाय-२,२२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता ०१-पाणी पुरवठा- १०२-ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने-(०२) (०१) (डब्यु्एस-६) (राज्यक्षेत्र)** " पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती/जिल्हा परिषद यांना अनुदाने (२२१५ १२१७) ४१ सहायक अनुदाने**"** या अर्थसंकल्पीय शिर्षाच्या खाती टाकावा व त्याखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागवावा. त्याचप्रमाणे योजनेचा उर्वरित खर्च (लोकवर्गणीसह) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने घेतलेल्या कर्जातून भागवायचा आहे.

५. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०५/का.१४७३, दि.१६/१०/२००८ व क्र.२१७/०९ व्यय-३, दि.३०/०६/२००९ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७०३१६४६३०००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**sd/-**
**( वा. म. तुरुकमाने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१
२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , नागपूर विभाग, नागपुर
३) जिल्हाधिकारी, वर्धा .
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा.
५) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर.
६) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,महाराष्ट्र शासन,पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट,पुणे.
७) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपुर.
८) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, वर्धा.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१,/२ मुंबई./नागपूर.
१०) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
११) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.
१२) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, वर्धा.
१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद वर्धा.
१४) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१५) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१६) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) मु.अ. तथा वि.का.अ, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
१८) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
१९) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.